**विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी**
**<u>परदेशात शिक्षणासाठी शिष्यवृत्ती योजना</u>**
**शैक्षणिक वर्ष २०१८-१९ मध्ये सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी करावयाच्या कार्यवाहीची दिशा ठरविण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : शिवृत्ती २०१८/प्र.क्र.११८ (भाग-२)/शिक्षण,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०४ डिसेंबर, २०१८

**<u>प्रस्तावना :-</u>**

शासन निर्णय, दि. ११-१०-२०१८ अन्वये विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी परदेशात शिक्षणासाठी शिष्यवृत्ती योजना राबविण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे. तसेच, शासन शुध्दीपत्रक, दि. १२-११-२०१८ अन्वये सदरची योजना शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासुन राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सन २०१८-१९ या चालु शैक्षणिक वर्षामध्ये परदेशात शिक्षणासाठी गेलेल्या विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील पात्र विद्यार्थीना या योजनेचा लाभ विहित कालमर्यादेत देणे आवश्यक आहे. त्यासाठी, सदर योजना चालू शैक्षणिक वर्ष २०१८-१९ करीता ऑनलाईन पध्दतीने राबवावी अथवा ऑफलाईन राबवावी ? यापुर्वीच परदेशात गेलेल्या विद्यार्थ्यांचे अर्ज चालू शैक्षणिक वर्षात कशा पध्दतीने उपलब्ध करुन घ्यावेत ? अर्जांची छानननी, पात्र विद्यार्थ्यांची निवड विहित कालमर्यादेत कशा पध्दतीने करावी ? सदर योजनेसाठी यावर्षी आवश्यक असलेला निधी वित्त विभागाकडून प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही सुरु असल्याने सद्य:स्थितीत आवश्यकता भासल्यास योजनेवरील खर्च कसा भागवावा ? इ. अनेक बाबींचा सारासार विचार करुन योजनेच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी करावयाच्या कार्यवाहीची दिशा ठरविण्यासाठी संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सन २०१८-१९ या चालु शैक्षणिक वर्षामध्ये परदेशात शिक्षणासाठी गेलेल्या विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील पात्र विद्यार्थीना परदेशात शिक्षणासाठी शिष्यवृत्ती योजनेचा लाभ शैक्षणिक वर्ष २०१८-१९ मध्ये देण्याकरीता करावयाच्या कार्यवाहीची दिशा ठरविण्यासाठी संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचे अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे-

| अ. क्र. | समितीमधील अधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय,म.रा., पुणे | अध्यक्ष |
| २ | संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, म.रा. मुंबई | सदस्य |
| ३ | संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, म.रा., पुणे | सदस्य |
| ४ | श्री. भा.र. गावित, सह सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५ | श्री. सास्तुरकर, उपायुक्त, समाजकल्याण, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ६ | उपायुक्त, (शिक्षण) समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ७ | श्रीमती विजया पवार, सह संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे | सदस्य |
| ८ | श्री. संजय धारुरकर,अवर सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग (तांशि-४), मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ९ | श्री. ठाकूर, अवर सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| १० | श्रीमती शोभा कुलकर्णी, सेवानिवृत्ती उपायुक्त (मावक), पुणे | सदस्य सचिव |

२. सन २०१८-१९ या चालु शैक्षणिक वर्षामध्ये परदेशात शिक्षणासाठी गेलेल्या विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील पात्र विद्यार्थीना या योजनेचा लाभ विहित कालमर्यादेत देणे आवश्यक आहे. त्यासाठी, उपरोक्त समितीने, सदर योजना चालू शैक्षणिक वर्ष २०१८-१९ करीता, ऑनलाईन पध्दतीने राबवावी अथवा ऑफलाईन राबवावी ? यापुर्वीच परदेशात गेलेल्या विद्यार्थ्यांचे अर्ज चालू शैक्षणिक वर्षात कशा पध्दतीने उपलब्ध करुन घ्यावेत ? अर्जांची छाननी, पात्र विद्यार्थ्यांची निवड विहित कालमर्यादेत कशा पध्दतीने करावी ? सदर योजनेसाठी यावर्षी आवश्यक असलेला निधी वित्त विभागाकडून प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही सुरु असल्याने सद्य:स्थितीत आवश्यकता भासल्यास योजनेवरील खर्च कसा भागवावा ? इ. अनेक बाबींचा सारासार विचार करुन योजनेच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी करावयाच्या कार्यवाहीबाबतचा अहवाल शासनास ८ दिवसांच्या आत सादर करावा.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८१२१०१५२६५२८३२२ असा आहे. तसेच सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2018.12.10 15:30:59 +05'30'

( भा.र. गावित )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**सोबत**-शासन निर्णय, दि. ११-१०-२०१८ व
शासन शुध्दीपत्रक, दि. १२-११-२०१८

**प्रति,**

१. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
२. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, म.रा. मुंबई
३. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, म.रा., पुणे
४. श्री. भा.र. गावित, सह सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
५. श्री. सास्तुरकर, उपायुक्त, समाजकल्याण, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. उपायुक्त, (शिक्षण) समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. श्रीमती विजया पवार, सह संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे

८. श्री. संजय धारुरकर,अवर सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग (तांशि-४), मंत्रालय, मुंबई
९. श्री. ठाकूर, अवर सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. श्रीमती शोभा कुलकर्णी, सेवानिवृत्त उपायुक्त (मावक), पुणे

**प्रत माहितीस्तव अग्रेषित,**

- मा. मंत्री (विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
- मा. राज्यमंत्री (विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
- मा. सचिव (विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.